**सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात चंद्रपूर सैनिक शाळेला सहाय्यक अनुदान रु. २,००,००,०००/- (रू. दोन कोटी फक्त) इतका निधी वितरीत करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः चंसैशा-२०२३/प्र.क्र. २३/एसएम-६**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक: ३० मार्च, २०२३

**संदर्भ :**

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२
२. शिक्षण संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक,पुणे यांचे पत्र क्र. सैचांश/अनुदान/२०२२-२३/ माध्य-ब/एस-५/७०५, दिनांक ०१.०२.२०२३

**प्रस्तावना :-**

चंद्रपूर सैनिक शाळेबाबत केंद्र सरकार (केंद्रीय संरक्षण मंत्रालय) व राज्य शासन यांच्यामध्ये दि. १५ जुन २०१६ रोजी सामंजस्य करार करण्यात आला आहे. सदर सामंजस्य करारातील तरतुदींनुसार प्रस्तुत सैनिक शाळेसाठी प्रतिवर्षी प्रशिक्षण व व्यवस्थापकीय खर्च, आहारभत्ता, शिष्यवृत्ती, जाहिरात खर्च, इमारत देखभाल, नगरपालिका कर, या प्रयोजनार्थ येणा-या आर्थिकभाराची जबाबदारी राज्य शासनाची आहे. शिक्षण संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक, पुणे यांनी चंद्रपूर सैनिकी शाळेस सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी वेतनेतर अनुदान रु.रु.५,६५,३३,९५३/- (रू.पाच कोटी पासष्ट लाख तेहतीस हजार नऊशे त्रेपन्न फक्त) इतक्या निधी वितरणाची शिफारस केल्यानुसार सदर निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची विनंती वित्त विभागास केली असता, वित्त विभागाने सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी २२०२०४६९ या लेखाशिर्षांतर्गत रु. २,००,००,०००/- (रू. दोन कोटी फक्त) इतका निधी मंजूर केलेला आहे. त्यास अनुसरून चंद्रपूर सैनिक शाळेला वेतनेतर अनुदानासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतूदीमधून चंद्रपूर सैनिक शाळेस सहाय्यक अनुदान (वेतनेतर) रु. २,००,००,०००/- (रू. दोन कोटी फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर खर्च "मागणी क्रमांक ई-२, २२०२-सर्वसाधारण शिक्षण, ०२ माध्यमिक शिक्षण-११०, अशासकीय माध्यमिक शाळांना सहाय्य (००) (०३) पूर्वाध्ययन सैनिकी शाळांना सहायक अनुदान (२२०२०४६९), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

३. सदर निधी वितरीत करण्यासाठी शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, चंद्रपूर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शक सूचनांचे तसेच वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२ मध्ये नमूद आदेशांचे काटेकोर पालन करणे आवश्यक राहील.

५. सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४१२/२०२३/व्यय-५, दिनांक ३०.०३.२०२३ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३३०१८१९५८९३२१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

बाखंदारे ३१/३/२०२३

**(बाबासाहेब खंदारे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव
३. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण )मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
४. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
५. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
६. सहायक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक, शिक्षण संचालनालय, पुणे
७. शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, चंद्रपूर.
८. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
९. प्रधान महालेखापाल(लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर.
११. वरीष्ठ कोषागार अधिकारी, पुणे.
१२. प्राचार्य, सैनिकी स्कूल, चंद्रपूर.
१३. सचिव, संरक्षण मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
१४. मानद सचिव, बोर्ड ऑफ गव्हर्नस सैनिकी स्कूल, नवी दिल्ली.
१५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. वित्त विभाग,व्यय-५/अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२
१७. निवड नस्ती (एसएम-६).